**उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक हे कार्यालय विभागीस संदर्भ सेवा रुग्णालय, नाशिक येथील विश्रामगृह येथे स्थलांतरीत करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय, क्रमांकः संकिर्ण २०१६/प्र.क्र. २०३ /आरोग्य ३

१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : ३० जानेवारी, २०१७.

**प्रस्तावना :**

उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक हे कार्यालय सध्या आरोग्य व कुटुंब कल्याण प्रशिक्षण केंद्र, नाशिक यांचे इमारतीत कार्यरत आहे. यापुर्वी हे कार्यालय विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय,नाशिक परीसरात कार्यरत होते. संदर्भ सेवा रुग्णालयाचे बांधकाम करण्याच्या वेळी रुग्णालय परीसरातील जुन्या इमारती पाडण्यात आल्याने उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक हे कार्यालय आरोग्य व कुटुंब कल्याण प्रशिक्षण केंद्र,नाशिक येथे स्थलांतरीत करण्यात आले. उपसंचालक कार्यालयास तसेच आरोग्य व कुटुंब कल्याण प्रशिक्षण केंद्र, नाशिक या दोन्ही कार्यालयांना त्यांच्या कामाचा आवाका व कर्मचारी संख्या विचारात घेता सध्याची जागा कमी पडत आहे.

सद्यस्थितीत विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, नाशिक परीसरात विश्रामगृहाची इमारत बांधून तयार आहे. सदर इमारत रिकामी असल्याने उपसंचालक आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक हे कार्यालय वरील विश्रामगृहाच्या जागेत स्थलांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

आरोग्य व कुटुंब कल्याण प्रशिक्षण केंद्र,नाशिक या कार्यालयाच्या परिसरात कार्यरत असलेले उपसंचालक आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक हे कार्यालय विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, नाशिक परिसरातील विश्रामगृहाच्या जागेत स्थलांतरीत करण्यास आता या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१३०१५३१३५५०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2017.01.30 17:22:03 +05'30'

**( रो.दि.कदम- पाटील )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१.महालेखापाल- १ / २, महाराष्ट्र, (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२.आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. सहसंचालक,आरोग्य सेवा (रुग्णालये- राज्यस्तर), मुंबई.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा (आरोग्य) पुणे.
६. उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक.
७. जिल्हा शल्य चिकित्सक,जिल्हा रुग्णालय, नाशिक.
८. वैद्यकीयअधिक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय,नाशिक.
९. कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/ सेवा-५/अर्थसंकल्प, सा.आ.वि. मंत्रालय,मुंबई.
१०. निवडनस्ती (आरोग्य-३)